**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बंद असलेल्या १४ प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या पुनरुज्जीवनाकरिता अनुदान वितरित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.२८/पा.पु.१९

जी.टी.हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०६ मार्च, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.९०/पापु-१९, दिनांक ३१ डिसेंबर २०१६
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.९०/पापु-१९, दिनांक ०९ फेब्रुवारी, २०१६
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २०.०४.२०१६

**प्रस्तावना -**

राज्य शासनाचा मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम हा ग्रामीण पाणी पुरवठ्याचा कार्यक्रम सन २०१६-१७ ते सन २०१९-२० या चार वर्षांच्या कालावधीत राज्यभरात राबविण्यात येणार आहे. या कार्यक्रमांतर्गत नव्याने घेण्यात येणा-या योजना, बंद असलेल्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन व प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची देखभाल दुरुस्ती या तीन प्रकारात राबविण्यात येणार आहे. बंद असलेल्या ८३ प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांच्या पुनरुज्जीवनाकरिता नियोजन/वित्त विभागाने रु.१३०.८६ कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यापैकी प्रशासकीय मंजुरी देण्यात आलेल्या १४ योजनांच्या अंमलबजावणी करिता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “ब” मधील योजनांपैकी १४ योजना संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन

निर्णयान्वये पुनरुज्जीवीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून या योजनां महाराष्ट्र जीवन प्राधिकरणा मार्फत राबविण्यात येणार आहेत. या योजनांच्या अंमलबजावणी करिता खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे रु. १७,४५,८९,३००/- ( रुपये सतरा कोटी पंचेचाळीस लाख एकोणनव्वद हजार तीनशे फक्त ) इतका निधी संचालक वित्त, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यानां अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे ( BEAMS) खालील अटींच्या अधीन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

| अ. क्र. | **योजनेचे नाव** | जिल्हा | ढोबळ किंमत |
|---|---|---|---|
| १ | मौ. पुतळी (ता.सडक अर्जुनी) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | गोंदिया | ६०,५९,०००/- |
| २ | मौ. देव्हाडी (ता . तुमसर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | भंडारा | ६९,५५,०००/- |
| ३ | मौ. तिखाडी गाडीबोरी -८ गांवे (ता. हिंगोली) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | हिंगोली | ४६,६९,०००/- |
| ४ | मौ. वस्सा-१२ गांवे (ता.जिंतूर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | परभणी | १,५७,०९,०००/- |
| ५ | मौ. करडा-२ गांवे (ता. रिसोड) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | ६८,२१,०००/- |
| ६ | मौ. उंबर्डा बाजार-९ गांवे (ता.कारंजा) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | १,९०,८१,०००/- |
| ७ | मौ. म्हसणी-१६ गांवे (ता.मानोरा) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | १९०,८०,०००/- |
| ८ | मौ. वारला-४ गांवे (ता.रिसोड) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | ८१,८९,०००/- |
| ९ | मौ. भामदेवी-३ गांवे( ता.कारंजा) प्रादेशिक पाणीपुरवठा योजना | वाशिम | ७०,३०,९००/- |
| १० | मौ. चांडस-६ गांवे ( ता.मालेगाव) प्रादेशिक पाणीपुरवठा योजना | वाशिम | १,८०,४८,१००/- |
| ११ | मौ. दुबळवेल-६ गांवे ( ता.मालेगाव) प्रादेशिक पाणीपुरवठा योजना | वाशिम | १,९०,६२,५००/- |
| १२ | मौ. जउळका-३ गांवे ( ता.मालेगाव) प्रादेशिक पाणीपुरवठा योजना | वाशिम | १,७६,४७,३००/- |
| १३ | मौ. वनोजा-४ गांवे ( ता.मंगरुळपीर )प्रादेशिक पाणीपुरवठा योजना | वाशिम | १,९०,७३,३००/- |
| १४ | मौ. चिंचांबाभर-४ गांवे( ता.रिसोड ) प्रादेशिक पाणीपुरवठा योजना | वाशिम | ७१,६४,२००/- |
| | एकूण | | १७,४५,८९,३००/- |

**अटी :-**

संचालक वित्त,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी हे अनुदान वितरीत करतांना तो वरील तक्त्या मधील योजनांना योजनानिहायच वितरीत होईल याची दक्षता घ्यावी. अन्य योजनांसाठी सदर निधी खर्च करु नये.

१) सदर निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वितरीत करण्यात आलेला निधी स्वीय प्रपंजी (PLA) किंवा अशा अन्य खात्या मध्ये ठेवण्यात येऊ नये.

३) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

४) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या कडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

५) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील व दिनांक ७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

६) अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी कार्यासन पापु-१९ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१९ कार्यासनास सादर करावे.

७) उपरोक्त निधी संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दि. २०/०४/२०१६ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रुपये १७,४५,८९,३००/- (रुपये सतरा कोटी पंचेचाळीस लाख एकोणनव्वद हजार तीनशे फक्त) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, (वित्त)( श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. का. जा.धलपे) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक, (वित्त) ( श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. का. जा.धलपे) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

याबाबतचा खर्च "मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा , १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. २०/०४/२०१६ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दिनांक २०/०४/२०१६ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ३ व ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६११३३०३७९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

K. J. Dhalape

Digitally signed by K. J. Dhalape
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f5563934b9d9717b048188d2a6bcc0f11290f50bc27dff39bf39cb577fa7a0a, cn=K. J. Dhalape
Date: 2017.03.06 16:09:25 +05'30'

**( का.जा. धलपे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
६) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.

७) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
८) जिल्हाधिकारी, गोंदिया, भंडारा, हिंगोली, परभणी व वाशिम.
९) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया, भंडारा, हिंगोली, परभणी व वाशिम.
११) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१२) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
१३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, गोंदिया, भंडारा, हिंगोली, परभणी व वाशिम.
१५) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, गोंदिया, भंडारा, हिंगोली, परभणी व वाशिम
१६) कार्यासन पापु-०४, पापु-१३ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय
१७) निवड नस्ती पापु-१९